जिल्हा पालक सचिवांनी जिल्हयातील कामे व योजनांचा आढावा घेण्याबाबत व जिल्हयाचे व्हीजन डॉक्युमेंट तयार करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक. प्रसुधा-२००९/प्र.क्र.११५/०९/१८-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :६/७/२०१०

वाचा : - १) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्रमांक: प्रसुधा-२००९/प्र.क्र.११५/०९/१८-अ, दिनांक १०-२-२०१०.

संदर्भाधीन दि.१० फेब्रुवारी २०१० च्या शासन निर्णयान्वये जिल्हा पालक सचिवांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या विहित केलेल्या आहेत त्यामध्ये जिल्हयातील सर्व योजनांतर्गत कामाचा आढावा घेणे व अडचणी सोडविणे अंतर्भूत आहे. दि.१९ जानेवारी २०१० रोजी महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेच्या बैठकीत जिल्हयातील जलसंधारणाच्या कामाचा दर्जा उंचावण्यासाठी जिल्हा पातळीवर पालक सचिवांनी आढावा घ्यावा असा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्याचप्रमाणे काही महत्वाच्या योजनांचा आढावा घेणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :**

जिल्हा पालक सचिवांनी खाली नमूद केलेल्या प्राधान्य क्रमानुसार योजनांचा आढावा घ्यावा.

१) टंचाई, नैसर्गिक आपत्ती, पाणीटंचाई, खत उपलब्धता याबाबत प्रसंगानुरुप आढावा,

२) जिल्हा नियोजनाच्या निधीच्या विनियोगाचा आढावा,

३) दारिद्रय रेषेखालील केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजनांचा आढावा (स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, अंत्योदय अन्न योजना, इंदिरा आवास योजना, विमा योजना, धान्यवाटप, राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना इ.)

४) जलसंधारणाच्या सर्व योजनांचा एकत्रित आढावा (हरीयाली, पाणलोट क्षेत्र, पाणी व्यवस्थापन इ.)

५) केंद्र पुरस्कृत विशेष कार्यक्रम (राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, सर्व शिक्षा अभियान, एकात्मिक बालविकास कार्यक्रम, जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुर्ननिर्माण अभियान, राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना इ.( NRHM, SSA, ICDS, JNURM, NREGS, ICT, TSC )

६) राज्याचे विशेष कार्यक्रम (महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोथ्थान महाअभियान, सुजल निर्मल, जलस्वराज्य, तंटामुक्ती अभियान, संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान, आदर्श गाव अभियान, पर्यावरण संतुलित ग्राम अभियान योजना इ.)

७) संगणकीकरणाचे सर्व कार्यक्रम (जिल्हास्तरावील व त्याखालील)

८) आदिवासींना वनक्षेत्रातील पट्टे देण्याची विशेष मोहिम.

९) मराठवाडा, विदर्भ,खानदेश, कोकण इ.पॅकेजचा त्या त्या विभागाप्रमाणे अंमलबजावणी आढावा.

१०) जिल्हयातील विशेष कार्यक्रम (असल्यास) (उदा.आत्महत्या निवारण मोहीम कार्यक्रम इ.)

११) मा.पंतप्रधान यांचा १५ कलमी कार्यक्रम.

२. जिल्हा स्तरावर विविध विकास कामांची यादी (चेकलिस्ट) जिल्हाधिकाऱ्यांनी तयार करावी. तदनुषंगाने वरीलप्रमााणे पालक सचिवांनी कामांचा आढावा घ्यावा.

३. पालक सचिवांनी त्यांना नेमून दिलेल्या जिल्हयाचे "व्हीजन डॉक्युमेंट" तयार करावे.

४. जिल्हा पालक सचिवांनी वरीलप्रमाणे कामाचा आढावा घेऊन आवश्यकतेनुसार जिल्हा पालकमंत्र्यांनाअवगत करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००७०६१६३२०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नंदकुमार जंत्रे)
सचिव(प्र.सु.व र.व का.)

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग ,
सर्व मंत्र्यांचे/राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,/स्वीय सहायक,
सचिव, निवडणूक आयोग, मुंबई ,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त/ पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पोलीस महानिरीक्षक व संचालक
प्रबंधक, मूळ व न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायाल, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व पोलीस उपमहानिरीक्षक/सर्व पोलीस आयुक्त
कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व मुख्य अभियंता, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग

सर्व अधीक्षक, कृषि अधिकारी/सर्व मुख्य वरसंरक्षक/सर्व सह निबंधक, सहकारी संस्था,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन,
सर्व जिल्हाधिकारी (पत्राने),
सर्व उपायुक्त (महसूल),सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी/सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व अधीक्षक/कार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग/सर्व विभागीय मृद संधारण अधिकारी/सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था/सर्व निवासी उप जिल्हाधिकारी/सर्व तहसिलांचे प्रभारी सहाय्यक किंवा उपजिल्हाधिकारी
महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई. (यांना प्रसिध्दीसाठी)
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती/१८-अ.